सामान्य राज्य सेवा,गट-ब या संवर्गातील संजीवन शास्त्रज्ञ या पदावर नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संआसे-२०२१/प्र.क्र.२५७/सेवा-१**
**गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, ८ वा मजला,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.**
**दिनांक:- १९ जुलै,२०२३**

वाचा :-

१. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८ दि.२२.०६.२०२१.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई यांचे पत्र क्रमांक :- पीएचआर १५२१/प्र.क्र ९५/२०२१/२८ दि.२८.०३.२०२३ रोजीचे शिफारस पत्र.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने वाचा २ येथील दि.२८.०३.२०२३ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या खालील तक्त्यात नमूद उमेदवारांची आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई अंतर्गत सामान्य राज्य सेवा,गट-ब या संवर्गातील “संजीवन शास्त्रज्ञ” या पदावर (सहाव्या वेतन आयोगानुसार जुनी वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड पे-४४००/-) आणि सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-१५ (४१८००-१३२३००) मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये परि.०२ मधील विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | मुळ जात प्रवर्ग | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीचा प्रवर्ग | संजीवन शास्त्रज्ञ,गट-ब पदावरील पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.सुभाष वासुदेव सावंत | खुला | खुला सर्वसाधारण-१ | विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक |
| २ | श्रीमती मिनल दिनेश कानसे | इमाव महिला | खुला महिला-१ | विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती. |

२. **अटी व शर्ती :-**

१. उमेदवाराने सादर केलेली माहिती असत्य आल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्तीपत्र रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई तसेच शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

२. सदर उमेदवारांची वैद्यकीय तपासणी सक्षम प्राधिकाऱ्याकडून करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र सहा महिन्यांच्या आत प्राप्त करुन घ्यावे. सदरील प्रमाणपत्रांची विहित मुदतीत पुर्तता करण्याबाबतची जबाबदारी संजीवन शास्त्रज्ञ व संबंधित आरोग्य परिमंडळाच्या उपसंचालक आरोग्य सेवा यांची राहील.

३. आवश्यकतेनुसार जात वैधता प्रमाणपत्र तसेच अप्रगत गटात मोडत असल्यास (नॉन क्रिमिलेयर) प्रमाणपत्र या आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या कालावधीत सादर करावेत. या प्रमाणपत्रांची पूर्तता सहा महिन्यांच्या कालावधीत न झाल्यास त्यांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. सदरील प्रमाणपत्रांची विहित मुदतीत पुर्तता करुन घेण्याची जबाबदारी सदर संजीवन शास्त्रज्ञ सामान्य राज्य सेवा, गट-ब व संबंधित आरोग्य परिमंडळाचे उपसंचालक आरोग्य सेवा यांची राहील. तसेच याबाबतचा कार्यपुर्ती अहवाल संचालक आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

४. सदर उमेदवारांची मुळ प्रमाणपत्रे व कागदपत्रे पुन्हा एकदा तपासून त्यानंतर संबंधित परिमंडळातील उपसंचालकांनी त्यांना नियुक्तीच्या ठिकाणी हजर करुन घ्यावे.

५. "संजीवन शास्त्रज्ञ सामान्य राज्य सेवा, गट-ब" या पदावर नियुक्त झालेल्या सदर उमेदवारास परीवीक्षा कालावधीत वाचा क्र.१ येथे नमूद शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती लागू राहतील. त्यांचा परीवीक्षाधीन कालावधी वाचा क्र.१ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार पूर्ण करणे बंधनकारक राहील. सदर उमेदवाराचा परीवीक्षाधीन कालावधी हा नियमानुसार दोन वर्षाचा राहील. सदर परीवीक्षाधीन कालावधीत रजा घेतल्यास त्या कालावधी इतका परीवीक्षाधीन कालावधी पुढे ढकलण्यात येईल.

६. "संजीवन शास्त्रज्ञ सामान्य राज्य सेवा, गट-ब" या पदाचा कार्यभार धारण केलेल्या दिनांकापासून दोन वर्ष इतका कालावधी हा परिविक्षाधीन स्वरुपाचा राहील. परिविक्षाधीन कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा वर्तणूक अयोग्य आढळल्यास त्यांची सेवा संपुष्टात आणली जाऊ शकेल किंवा त्यांचा परिवीक्षाधीन

कालावधी १ वर्षाच्या कालावधीसाठी वाढविला जाईल. त्या वाढवलेल्या कालावधीमध्ये देखील त्यांचे काम समाधानकारक झाले नाही तर, त्यांची सेवा कोणत्याही पूर्व सुचनेशिवाय समाप्त करण्यात येईल.

७. परिवीक्षाधीन उमेदवारास परिवीक्षा कालावधीमध्ये पहिली वेतनवाढ लागु राहील तथापि, परिवीक्षाधीन कालावधी पुर्ण केल्याचे शासन आदेश निर्गमीत झाल्या शिवाय त्यापुढील वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

८.परिवीक्षाधीन कालावधीत कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच वर्तणूक आयोग्य अननुरुप आढळल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील. परीवीक्षाधीन कालावधी पुर्ण झाल्याचे शासन आदेश नसतांना पुढील वेतनवाढ दिल्यास वेतनवाढ अनुज्ञेय करणारे संबंधित सक्षम प्राधिकारी जबाबदार राहतील.

९.उमेदवारांना त्यांचे सेवा कालावधीत केंद्र शासनाने विहित केलेल्या अटींवर चार वर्षाच्या कालावधीकरीता (प्रशिक्षण कालावधी धरुन) जरुरी पडल्यास भारत संरक्षण किंवा संरक्षण सेवेशी संबंधीत अशा पदावर त्यांना काम करावे लागेल, हे दायित्व सेवेच्या पहिल्या दहा वर्षापर्यंत राहील व ४५ वर्षे वयानंतर सर्वसाधारणपणे लागू होणार नाही.

१०. त्यांना शासन विहित करील त्याप्रमाणे प्रशिक्षण पार पाडावे लागेल.

११. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने जाहीर केलेल्या गुणवत्ता यादीतील उमेदवारांची जेष्ठता संबंधित उमेदवार विहीत मुदतीत रुजु झाल्यास गुणानुक्रमानुसार (Merit List) ठरविण्यात येईल. विहित मुदतीत रुजु न होणाऱ्या उमेदवारांची सेवाजेष्ठता बाधीत होईल.

१२. सामान्य राज्य सेवा, गट-ब या संवर्गातील नामनिर्देशनाने नियुक्ती झाल्यावर त्यांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदींनुसार निश्चित केले जाईल.

१३. सदर उमेदवारांची नियुक्ती “संजीवन शास्त्रज्ञ” पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदी तसेच त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या दुरुस्त्या यांच्या अधिन राहून विनियमित करण्यात येईल.

१४.सदर उमेदवारांची वेतन श्रेणी (जुनी वेतनश्रेणी रु.९३००-रु.३४८००, ग्रेड पे रू.४४००/-) सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-१५ (रु.४१८००-रु.१,३२,३००) असे राहील. याव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरविल त्या दराने अन्य भत्ते

अनुज्ञेय राहतील.

१५.उमेदवाराने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत त्यांच्या नेमणूकीच्या ठिकाणी रुजू झाले पाहिजे. अन्यथा १५ दिवसानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखाने १५ दिवसानंतर रूजु होणाऱ्या उमेदवारास रूजु करुन घेऊ नये.

१६.उमेदवारांनी हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधीच्या नियमावलीनूसार जर ते या परीक्षा अगोदरच उत्तीर्ण झाले नसतील किंवा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सूट मिळाली नसेल तर त्यांनी एतदर्थ मंडळाची मराठी/हिंदी विषयाची परीक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. अन्यथा तदनंतर त्यांच्या पुढील वेतनवाढी रोखून ठेवण्यात येतील.

१७.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९.०३.२००३ अन्वये संगणक वापराबाबतचे ज्ञान आवश्यक अर्हता म्हणून ठरविण्यात आले असल्याने, सदर उमेदवारांनी खालीलपैकी आवश्यक एक प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत प्राप्त करणे आवश्यक राहील, अन्यथा त्यांच्या सेवा समाप्त होतील.

अ. D. O. E. A. C. C. सोसायटीच्या अधिकृत “C. C. C.” किंवा “O” स्तर “A” स्तर किंवा “B” किंवा “C” स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र.

किंवा,

ब. महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक, संगणक ज्ञानाची अतिरिक्त अर्हता निश्चित केली आहे.

१८. ज्या उमेदवारांची दि.३१.१०.२००५ नंतर शासन सेवेत नियुक्ती झाली असेल अश्या उमेदवारांना वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अंनियो १००५/ प्र. क्र. १२६/ सेवा-४, दि.३१.१०.२००५ नुसार नवीन परिभाषित अंशदान निवृत्ती योजना लागू राहील.

१९. सदर उमेदवारांना शासनसेवेत कमीत कमी पाच वर्षे राहण्याचे किंवा न राहील्यास रु.५००/- अगर शासन वेळोवेळी विहित करील ती रक्कम दंड म्हणून देण्याचे बंधन राहील. तसेच इतर सेवाशर्तींच्या पूर्ततेसाठी बंधपत्र लिहून द्यावे लागेल.

२०. सदर उमेदवारांना एक महिन्याची आगाऊ सूचना दिल्याशिवाय अगर एक महिन्याची आगावू वेतनपूर्ती केल्याशिवाय सेवामुक्त होता येणार नाही.

२१. सदर उमेदवारांना वर उल्लेख केलेल्या अटींशिवाय महाराष्ट्र शासनाच्या सेवेत असलेल्या

इतर कर्मचारी वर्गास लागू असणारे इतर नियमसुध्दा लागू राहतील.

२२. नियमानुसार आवश्यक असल्यास त्यांना संरक्षण विभागात सेवा करण्याची हमी द्यावी लागेल.

२३. एक पती/ पत्नी हयात असतांना त्यांना दुसरा विवाह करता येणार नाही.

२४. त्यांनी राष्ट्रनिष्ठेची शपथ घेतली पाहिजे.

२५. त्यांची महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली होऊ शकते.

२६. सदर उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२२१७५४४१४४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=25beab36016c9d18b34e813ce2c51ae3ba862f5ee940326a80ef8dfa067b2f3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0B7B24B48EA4D47E171EF81F64A0D535EBB08400DA6060265D4872BADAEACA, cn=MAHESH MADHUKAR LAD
Date: 2023.07.19 17:35:01 +05'30'

महेश म.लाड
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई. (पत्राने)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई, नागपूर.
४. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १६-ब/ १२), मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कु. क.), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, अमरावती,नाशिक मंडळ
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,नाशिक
९. जिल्हा शल्य चिकित्सक, अमरावती,नाशिक
१०.जिल्हा आरोग्य अधिकारी, अमरावती,नाशिक
११.संबधित सर्व उमेदवार (नोंदणीकृत डाकेने)
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग, निवड नस्ती सेवा-१